वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत जालना जिल्ह्यातील पूर्ण झालेल्या कामांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः तांसुयो-२०२३/प्र.क्र.३२६/योजना-१**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२१/प्र.क्र.६३/योजना-१, दि.१५.०३.२०२२.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२२/प्र.क्र.५८/योजना-१, दि.३१.०३.२०२२.
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२२/प्र.क्र.६३/योजना-१, दि.२०.०५.२०२२.
४) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जालना यांचे क्रमांक १८६०, दिनांक २६.०४.२०२३ चे पत्र.

**ज्ञापन :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत संदर्भाधिन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये जालना जिल्ह्यातील रु. ७२८.०० लक्ष रक्कमेच्या ८६ कामांना, संदर्भ क्रमांक २ अन्वये रु. २०२.०० लक्ष रक्कमेच्या २८ कामांना तसेच संदर्भ क्रमांक ३ अन्वये रु. ३३१.०२ लक्ष रक्कमेच्या ४८ अशा एकूण १६२ कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदरहू कामांना अनुक्रमे रु. ३०७.०० लक्ष, रु.२१.०० लक्ष तसेच रु. १००.०० लक्ष असा एकूण रु.४२८.०० लक्ष निधी उपलब्ध करुन देण्यात आला असून उर्वरित निधी कामांच्या पुर्ततेनुसार व निधीच्या उपलब्धतेनुसार देण्यात येणार आहे.

२. उपरोक्त नमूद १६२ कामांपैकी पुर्ण झालेल्या ५ कामांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक ४ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदरहू प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील नमूद पुर्ण झालेल्या ५ कामांना रु. ३९.०० लक्ष (अक्षरी रुपये एकोणचाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.लक्षमध्ये)

| अ. क्र. | शा.नि.दिनांक व अ.क्र. | तालुका | गावाचे नाव / तांडा वस्तीचे नाव | कामाचे स्वरुप | कामाची रक्कम | उपलब्ध करुन दिलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २०.०५.२०२२ अ.क्र.१ | जालना | दहिफळ (वसंतराव नाईक नगर) | सिमेंट रस्ता | १०.०० | ३.०० | ७.०० |
| २. | १५.०३.२०२२ अ.क्र.३९ | जालना | दहिफळ (वसंतराव नाईक नगर) | सिमेंट रस्ता | १०.०० | ४.०० | ६.०० |

| अ. क्र. | शा.नि.दिनांक व अ.क्र. | तालुका | गावाचे नाव / तांडा वस्तीचे नाव | कामाचे स्वरुप | कामाची रक्कम | उपलब्ध करुन दिलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३. | १५.०३.२०२२ अ.क्र.५५ | जालना | दहिफळ (सेवालाल तांडा) | सभामंडप | १०.०० | ४.०० | ६.०० |
| ४. | ३१.०३.२०२२ अ.क्र.१० | जालना | दहिफळ (वसंतरावनगर तांडा) | जोडरस्ता | १०.०० | ०० | १०.०० |
| ५. | ३१.०३.२०२२ (अ.क्र.२२) | जालना | दहिफळ (वसंतराव नाईक नगर) | भूमिगत नाली | १०.०० | ०० | १०.०० |
| **एकूण** | | | | | **५०.००** | **११.००** | **३९.००** |

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक आयुक्त, समाज कल्याण, जालना यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सहायक आयुक्त, समाज कल्याण जालना यांनी वरील निधी वितरीत करण्यापुर्वी संदर्भाधिन शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याची खातरजमा करावी.

५. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षातर्गत २०२३-२४ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२८१७१२४७१९३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHANT SHRIRANG KUMBHAR

Digitally signed by SUSHANT SHRIRANG KUMBHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2121bd11b9a537ffee960f52794a0a124496925451 7ad088cf267eaedf9b53f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5E8A8657AC266FF9154647CC20900A57B2B A9AD3DB088D187EB151F2E10F16C3, cn=SUSHANT SHRIRANG KUMBHAR
Date: 2023.08.28 17:15:48 +05'30'

**( सु. श्री. कुंभार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, जालना.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
७. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, औरंगाबाद.
८. सहायक आयुक्त, समाज कल्याण, जालना.
९. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जालना.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
११. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (योजना-१).